**अनुसूचित जमातीचे जातवैधता प्रमाणपत्र सादर न केलेल्या अधिकारी/कर्मचारी यांच्यासाठी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या आस्थापनेवर अधिसंख्य पदे निर्माण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः न्यायाप्र१९२१/प्र.क्र.१२७/पापु-२३**
७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल
क्रॉफर्ड मार्केटजवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४००००१
तारीख: २० मे, २०२२

**वाचा :-**

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दिनांक २१.१२.२०१९
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः बीसीसी-२०२०/प्र.क्र.१८७अे/१६-ब, दिनांक ३०.०६.२०२०
३) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे पत्र क्रमांकः मजीप्रा/शा.नि.२१.१२.२०१९/१०३/आ-३, दिनांक २७.११.२०२०
४) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र : मजीप्रा-११२०/प्र.क्र.९६/पापु-२३, दिनांक २८.१२.२०२०
५) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे पत्र क्रमांकः मजीप्रा/सर्वोच्य न्यायालय निर्णय/३/२०२०/ आ-१, दिनांक १७.०३.२०२१
६) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे पत्र क्रमांकः मजीप्रा/सर्वोच्य न्यायालय निर्णय/३/२०२०/ आ-१ (भाग-२), दिनांक ४.०५.२०२२

**प्रस्तावना :-**

अनुसूचित जमाती प्रवर्गातून नियुक्त झालेल्या तथापि अनुसूचित जमातीचे जात वैधता प्रमाणपत्र सादर करु न शकलेल्या अथवा अन्य मागास प्रवर्गाचे जात वैधता प्रमाणपत्र

सादर केलेल्या अधिकारी/ कर्मचाऱ्यांसाठी अधिसंख्य पदे निर्माण करुन त्यांच्या सेवा अधिसंख्य पदावर वर्ग करण्याच्या सूचना सामान्य प्रशासन विभागाने संदर्भाधीन दि.२१.१२.२०१९ च्या शासन निर्णयान्वये दिलेल्या आहेत. त्यानुसार महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या अधिपत्याखालील कार्यालयात ९८ कर्मचा-यांच्या सेवा अधिसंख्य पदावर वर्ग करण्यासाठी ९८ अधिसंख्य पदे निर्माण करण्याचा प्रस्ताव महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने संदर्भाधीन दिनांक २७.११.२०२० च्या पत्रान्वये शासनास सादर केला होता. त्यानुषंगाने संदर्भाधीन दिनांक २८.१२.२०२० च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या अधिनस्त कार्यालयामधील कर्मचाऱ्यांसाठी ९८ अधिसंख्य पदे निर्माण करण्यात आली आहेत. या शासन निर्णयाच्या सहपत्रातील यादीमध्ये अ.क्र. ११ येथे श्री. एम. ए. सोरते यांचे नाव अंतर्भूत असून त्यांचे नाव वगळण्याचे प्राधिकरणाने संदर्भाधीन (५) व (६) च्या पत्रान्वये प्रस्तावित केले आहे. त्यानुषंगाने श्री. सोरते यांचे नाव अधिसंख्य पदांच्या यादीतून वगळण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय:-

श्री. सोरते हे हलबा या जातीचे असून सन १९९१ मध्ये त्यांची महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामध्ये सहायक अभियंता श्रेणी-२ या पदावर अनुसूचीत जमाती प्रवर्गातून नियुक्ती करण्यात आली होती. मात्र तत्कालीन समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रिडा विभागाच्या दिनांक ७.१२.१९९४ च्या शासन निर्णयान्वये “हलबा” ही जात अनुसूचीत जमाती प्रवर्गातून वगळून विशेष मागास प्रवर्गामध्ये समाविष्ट झाल्यामुळे श्री. सोरते यांना अधिसंख्य पदावर वर्ग करण्यात आले होते. मात्र सन २००८ मध्ये “हलबा” ही जात विशेष मागास प्रवर्गातून वगळून पुन्हा अनुसूचीत जमाती प्रवर्गामध्ये अंतर्भूत करण्यात आली असल्यामुळे श्री. सोरते यांना अधिसंख्य पदावर वर्ग करण्याची आवश्यकता नसल्याचे प्राधिकरणाने संदर्भाधीन (५) व (६) च्या पत्रान्वये निदर्शनास आणले आहे. त्यामुळे संदर्भाधीन दिनांक २८.१२.२०२० च्या शासन निर्णयाच्या सहपत्रातील यादीमध्ये अ.क्र. ११ येथे असलेले श्री. एम. ए. सोरते यांचे नाव यादीतून वगळण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०५१९१७३८५६१६२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA MAHADEV GENGAJE

Digitally signed by RAJENDRA MAHADEV GENGAJE
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9e6d5121ea1547c5b6abac50546c582bc9cb02d8c4ee0e57eb3442ad725208b5, serialNumber=d90328c2fc4e73b881bcfea3bc5824fa462a2ec1e4ead4bfe3b4979112bdb493, cn=RAJENDRA MAHADEV GENGAJE
Date: 2022.05.20 17:59:46 +05'30'

**(रा. म. गेंगजे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
२) संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नवी मुंबई.
३) मुख्य अभियंता/अधीक्षक अभियंता/कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)
४) आयुक्त, अपंग कल्याण, पुणे
५) संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे
६) महासंचालक, डॉ. बाबासाहेब आंबेडकर संशाधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
७) सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण,
८) सर्व अध्यक्ष/सदस्य, जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समिती
९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य-१/२, मुंबई/नागपूर

**प्रत :**

१) मा. मंत्री (पाणीपुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. मंत्री (पाणीपुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) अप्पर मुख्य सचिव (पाणीपुरवठा व स्वच्छता) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४) प्रधान सचिव (साप्रवि/साविस) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
५) कार्यासन १६ब, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) कार्यासन (वित्तीय सुधारणा), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
७) निवडनस्ती पाप-२३